**निर्मल ग्राम पुरस्कार प्राप्त झालेल्या गावे / वाड्यांना ग्रामीण पाणी पुरवठा योजना घेताना प्राध्यान देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्र. विपआ-१०११/प्र.क्र.०६९/पापु-०७**
**मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२ ,दि. २७ मे, २०११**

**वाचा-** १) शासन निर्णय,पा.पु.व.स्व.वि.क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दि.१७ मार्च, २०१०

२)शासन शुध्दीपत्रक, पा.पु.व.स्व.वि.क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दि.३० ऑक्टोबर, २०१०

३) शासन शुध्दीपत्रक, पा.पु.व.स्व.वि.क्र.ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दि.३१ जानेवारी, २०११

**प्रस्तावना :**

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्र. १, २ व ३ येथील शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार गावामध्ये पिण्याची पाणी पुरवठा योजना घेण्यासाठी धोरणातील तत्व व प्राधान्यक्रम निश्चित करण्यात आलेले आहेत. या नुसार सध्या गावे / वाड्यांची निवड करण्यात येते. मात्र ज्या गावांना निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेला आहे अशा गावांचा देखील विचार गावे / वाड्यांचा निवड करताना प्राधान्याने करण्यात यावा, अशा सूचना लोक प्रतिनिधीकडून विधान मंडळामध्ये केल्या जातात.

ग्रामीण पाणी पुरवठा योजनेसाठी गावाची पात्रता ठरविताना ते गाव / वाडी ६० टक्के हागंदरीमुक्त असण्याची व दुसरा हप्ता देण्यापूर्वी तो १०० टक्के हागंदारी मुक्त असल्याची अट घालण्यात आली आहे. हि बाब विचारात घेता, जी गावे विशेष प्रयत्नाने निर्मल झालेली आहेत व त्यासाठी त्यांना केंद्र शासनाचा पुरस्कार प्राप्त झालेला आहे, अशा गावांना ग्रामीण पाणी पुरवठा योजना घेताना प्राधान्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

उपरोक्त परिस्थिती विचारात घेता, ज्या गावे / वाड्यांना निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेला आहे अशा गावांना ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या मंजुरीमध्ये पुढीलप्रमाणे प्राधान्य देण्यात यावे.

१. जिल्हा स्तरावर ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाचा वार्षिक कृती आराखडा तयार करताना, ज्या गावांना निर्मल ग्राम पुरस्कार मिळालेला आहे, व त्या गावांनी हे सातत्य राखले

असल्यास (मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी खात्री केल्यास) अशा गावांचा / वाड्यांचा विचार ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचा प्राधान्यक्रम पाणी गुणवत्ता बाधित गावे / वाड्यांच्या खालोखाल करण्यात यावा. म्हणजेच या गावे / वाड्यांना पाणी गूणवत्ता बाधित गावे / वाड्यांच्या नंतर प्राधन्य देण्यात यावे.

२. ज्या गावांना या आर्थिक वर्षात निर्मळ ग्राम पुरस्कार प्राप्त झालेला आहे. अशा गावांना दुसऱ्या टप्प्याचा निधी वितरीत करीत असताना, त्या गावांनी पहिला हप्ता प्राप्त झाल्यापासून गाव निर्मल असल्याचे सातत्य ठेवले आहे याची खातरजमा करून घेऊन दुसरा हप्ता वितरीत करावा.

३. या व्यतिरिक्त संदर्भाधीन शासन निर्णयामधील कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही.

सदर शासन शुद्धपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब-साईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०५२७१५५१२६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
**(र .अं. खडसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

***प्रत,***
*मा.मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,*
*मा.राज्य मंत्री(पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव,*
*सर्व विभागीय आयुक्त,*
*सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई*
*संचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे,*
*सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद*
*मुख्य अभियंता,भारत निर्माण कक्ष,नवी मुंबई*
*सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद*
*सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद*
*महालेखापाल,महाराष्ट्र - १ मुंबई(लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)*
*महालेखापाल,महाराष्ट्र - २ नागपूर (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)*
*मुख्य लेखा परिक्षक,स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई*
*उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती व नागपूर*
*सर्व प्रादेशिक उपसंचालक,भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,*
*सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व गट विकास अधिकारी,पंचायती समिती*
*नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई*
*वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई*
*ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई*
*मंत्रालयातील इतर सर्व विभाग,*
*पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने*
*निवड नस्ती,पापु-०७*